**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू, जि.ठाणे यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळांचे दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : शाआदु-२००९/प्र.क्र.२२४/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ ऑगस्ट, २००९.

**वाचा :** उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, क्र.५ डहाणू यांचे कार्यालयीन पत्र जा.क्र.सा.बा./ड/प्रशा-२/५८२८/२००९, दि.२६/८/२००९.

**शासन निर्णय :** उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.५, डहाणू यांनी त्यांच्या दि.२६/८/२००९ च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू, जि.ठाणे यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, धामणगांव, रणकोळ, उर्से, तवा, खंबाळे कळमदेवी, महालक्ष्मी व सायवन येथील दुरुस्ती करण्याकरिता एकूण रु.६६,७५,५१३/- रक्कमेची अंदाजपत्रके व आराखडे प्रशासकीय मान्यता देण्यासाठी पाठविलेली आहेत.

२. अंदाजपत्रके शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जव्हार यांनी तयार केली असून उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, क्र.५ डहाणू यांनी तपासली आहेत.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळांचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. तथापि सदर कामे दुरुस्तीची असल्यामुळे प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळांच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास एकूण रु.६४,१४,५९२/-(रुपये चौसष्ट लाख, चौदा हजार पाचशे ब्याणऊ फक्त ) इतक्या रक्कमेस खाली दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | आश्रमशाळेचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १ | धामणगांव आश्रमशाळा येथे नविन ५ स्नानगृह व ५ शौचालय बांधणे ता. डहाणू | रु. ३,५०,०००/- |
| २ | कळमदेवी येथील आश्रमशाळा इमारतीची दुरुस्ती करणे, ता. डहाणू | रु.४,९१,००९/- |
| ३ | रणकोळ आश्रमशाळा येथे नविन ५ स्नानगृहे व ५ शौचालये बांधणे ता. डहाणू | रु. ३,५०,०००/- |
| ४ | उर्से आश्रमशाळा येथे नविन ५ स्नानगृहे व ५ शौचालये बांधणे ता. डहाणू | रु. ३,५०,०००/- |
| ५ | तवा आश्रमशाळा येथे नविन ११ वी १२ वी वर्गाच्या मुलांसाठी नविन ५ स्नानगृहे व ५ शौचालये बांधणे ता. डहाणू | रु.३,४६,४५९/- |
| ६ | खंबाळे आश्रमशाळा इमारतीची दुरुस्ती करणे ता. डहाणू | रु. ५,४१,०४६/- |

| | | |
|---|---|---|
| ७ | तवा येथील ११ वी १२ वी साठीच्या ४ वर्ग खोल्यांची दुरुस्ती करणे ता. डहाणू | रु.६,२०,८३१/- |
| ८ | तवा येथील अस्तित्वातील शौचालय व स्नानगृह (२ युनीट) दुरुस्त करणे ता. डहाणू | रु. ८,००,०००/- |
| ९ | सायवन येथील आश्रमशाळा इमारतीची दुरुस्ती (वर्ग-४ थी, ६वी, ९ वी व १० वी ) | रु.६,५७,११९/- |
| १० | महालक्ष्मी येथील शासकीय आश्रमशाळेची दुरुस्ती करणे (वर्ग-४ थी, ६वी, ९ वी व १० वी) | रु.४,६३,७७३/- |
| ११ | महालक्ष्मी येथील शासकीय आश्रमशाळेची दुरुस्ती करणे.( १ ली, २ री, ६ वी ८ वी ) | रु. १,२०,१३२/- |
| १२ | सायवन येथील आश्रमशाळा इमारतीची दुरुस्ती (वर्ग ५,३, ७ वी ओटी, किचन | रु. ६,४२,०३२/- |
| १३ | सायवन येथील आश्रमशाळेच्या वर्ग खोल्यांचे बांधकाम (शेड्स) | रु. ६,८२,१९९/- |
| | एकूण | रु. ६४,१४,५९२/- |

४. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० साठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विपअ- १००१/ प्र.क्र.४६/ २००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०९०५१४१६३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( गी. मो. चांदे )
कक्ष अधिकारी

प्रति,

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक (सोबत मुळ अंदाजपत्रक)
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे .
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे
उप विभागीय अभियंता, सा.बां.उपविभाग, क्र.५, डहाणू
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

---